GR-200407301522-10001-1201

प्रधानमंत्री ग्राम सडक योजनेतील कार्यक्रमाची अंमलबजावणी निविदा प्रक्रीयेतील कालावधी कमी करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्रमांक : जिपर-२००२/प्र.क्र.३१/यो-८(४१)
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : १३ नोव्हेंबर, २००३

**वाचा :** १) केंद्र शासनाच्या ग्रामीण विकास मंत्रालयाच्या दिनांक १५ डिसेंबर, २००१ अन्वये प्राप्त झालेल्या सुचना

२) शासन परिपत्रक साबांवि/निविदा/१०/२०००/प्र.क्र. ५०२/इमारती २, दिनांक २५ ऑक्टोबर २०००.

३) शासन निर्णय : ग्राम विकास व जलसंधारण विभाग,क्रमांक जिपर २०००/प्र.क्र.३१/३५, दिनांक ३१ मार्च २००१.

४) शासन निर्णय ग्राम विकास विभाग, क्रमांक जिपर २०००/प्र.क्र. ३१/३५, दिनांक २८ सप्टेंबर, २००१ व १७ जानेवारी, २००२

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने १५ ऑगस्ट, २००० रोजी प्रधानमंत्री ग्रामसडक योजना जाहीर केली, सदर योजना सार्वजनिक बांधकाम विभागाने सन २०००-२००१ या वर्षात अंमलबजावणी केली. तदनंतर ग्राम विकास विभागाच्या अखत्यारित असलेल्या जिल्हा परिषदेमधील बांधकाम विभागामार्फत सन २००१-२००२ पासून योजनेची अंमलबजावणी सुरु आहे. सद्यस्थितीत राज्यातील रस्ता बांधणीची कामे अंतिम टप्प्यावर असून काही ठिकाणी फेरनिविदा झालेल्या आहेत.

२. दिनांक १७ जानेवारी २००२ च्या शासन निर्णयान्वये सदर योजनेतील कार्यक्रमाचे अंमलबजावणीबाबत स्पष्ट सुचना दिलेल्या आहेत. सदर निर्णयातील निविदा प्रक्रीया (Tendering /Bidding Procedure) अटी व शर्ती विहित केल्या आहेत. सदर कार्यक्रम विहित कालावधीत पूर्ण करणे आवश्यक आहे. निविदा प्रक्रीयाचा कालावधी कमी केल्यास रस्ता बांधणीच्या कामास लवकर सुरुवात होवून विहित मुदतीत सदर योजनेचे काम पूर्ण करण्याच्या दृष्टीने निविदा प्रक्रीयेचा कालावधी कमी करण्याचा विशेष बाब म्हणून फक्त या योजनेसाठी प्रस्ताव विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियम पुस्तीकेनुसार निविदा प्रक्रीयेचा कालावधी ४५ दिवसाचा आहे. तथापि केंद्र शासनाच्या सदर योजनेसाठी एक विशेष बाब

म्हणून हा कालावधी दिनांक १७ जानेवारी, २००२ च्या शासन निर्णयान्वये ३३ दिवसांचा करण्यात आला होता. केंद्र शासनाच्या प्रधानमंत्री ग्राम सडक योजनेतील कालबध्द कार्यक्रम विहित मुदतीत पूर्ण व्हावा यासाठी एक विशेष बाब म्हणून निविदा प्रक्रीयेचा कालावधी २१ दिवसांचा 'या शासन निर्णयान्वये करण्यात येत आहे.

अ निविदेचा एकंदरीत कालावधी ३३ दिवसा ऐवजी २१ दिवसांचा करण्यात यावा.

ब निविदा जाहीर केल्यापासून पांचव्या दिवशी कार्यक्रम अंमलबजावणी पथकाने निविदा कारांना तांत्रिक बाबीवर माहिती देण्यासाठी व शंका समाधानासाठी सभा घ्यावी. पांचवा दिवस सुट्टीचा असल्यास त्यानंतरच्या कार्यालयीन दिवशी सभा घेण्यात यावी. कार्यक्रम अंमलबजावणी पथकाने केलेला खुलासा व निविदेतील बदल (कॉमन सेट ऑफ डेव्हीएशन) हे निविदेचा एक भाग म्हणुन समजण्यात यावे व तसा खुलासा निविदाकारांना करावा.

क उपरोक्त सभेनंतर दोन आठवडयानी व कोणत्याही परिस्थितीत जाहीरातीच्या पहिल्या दिवसापासून १६व्या दिवशी निविदा प्राप्तीचा अंतिम दिवस राहील. यापूर्वीच निर्देशित केल्याप्रमाणे निविदा दोन लिफाफयात असतील पैकी पूर्व अर्हता ठरविण्याचा पहिला लिफाफा १६व्या दिवशी समिती सर्वा समोर उघडेल. जिल्हा परिषदेमधील स्थायी समितीच्या वतीने मुख्य कार्यकारी अधिकारी, कार्यकारी अभियंता व मुख्य लेखा व वित्त अधिकारी प्रत्येक पान स्वाक्षरीत करील. दुसरा लिफाफा कार्यक्रम अंमलबजावणी पथक प्रमुख यांच्याकडे एकत्रितपणे मोहरबंद स्थित राहील.

ड यानंतर पांच दिवसाने म्हणजे २१ व्या दिवशी आयुक्तांच्या पूर्व मान्यतेने पहिल्या लिफाफयावरील पूर्व अर्हतेबाबतचा निर्णय जाहीर करण्यात येईल व अर्हता प्राप्त निविदा जहीरपणे उघडण्यात येवून तुलनात्मक तक्ता तयार करण्यात येईल. निविदा न उघडण्याची कारणे, पहिली अर्हता पाकिट उघडल्यानंतर विभागीय आयुक्तांच्या पूर्व मान्यतेने कार्यक्रम अंमलबजावणी पथक पांच दिवसानंतर जाहीर करील. आयुक्तांनी निर्णयासाठी मुख्य अभियंता यांचा सल्ला घ्यावा.

इ अर्हता प्राप्त न झालेल्या निविदा-कारांचा दुसरा लिफाफा न उघडता एकत्र सिलबंद लिफाफयात समितीच्या सदस्यांच्या सहीनिशी दप्तरी दाखल करण्यात येईल.

ई यानंतरच्या पांच दिवसाच्या कालावधीत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदेच्या स्थायी समितीची सभा बोलावतील व स्थायी समितीने तयार केलेल्या तुलनात्मक तक्त्यातील कमीतकमी दराची निविदा स्विकृत करण्यासाठी स्थायी समितीची मान्यता घेण्याबाबत प्रस्ताव सादर करतील. स्थायी समितीच्या अभिप्रायासह विभागीय आयुक्तांकडे कळवतील. विभागीयआयुक्त मुख्य अभियंत्याच्या सल्ल्याने निविदेस स्वीकृतिस मान्यता देतील. ही प्रक्रीया दोन दिवसात पूर्ण करण्याची जबाबदारी राहील.

ख जिल्हा परिषदेमधील स्थायी समितीने स्वीकृतीस मान्यता दिल्यानंतर नजिकचा कालावधीत होणाऱ्या जिल्हा परिषदेच्या सर्वसाधारण सभेपुढे सदर निर्णय माहितीस्तव सादर करण्यात येईल.

ग निविदा स्विकृत केल्यानंतर कोणत्याही परिस्थितीत १५ दिवसाचे आत कंत्राटदारास कार्यारंभ आदेश देण्यात यावेत.

प्रधानमंत्री ग्रामसडक योजना हा कालबध्द कार्यक्रम असल्यामुळे सदर योजनेतील कामे विहित वेळेत पूर्ण न झाल्यास राज्याला आर्थिक नुकसान होऊ नये व सदर योजना यशस्वी होण्दाच्या दृष्टीने रस्ते बांधणीच्या कामासाठी दुसऱ्यांदा व त्यानंतरच्या (Socend or Subsequent Calls) निविदा (फेर निविदा) मागविण्याचा कालावधी १० दिवसाचा करण्यास फक्त या योजनेपुरता एक विशेष बाब म्हणून मान्यता देण्यास येत आहे.

हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ७४४/व्यय-१५, दिनांक १६/१०/२००२ च्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( दि.मा.मोरे )
मुख्य अभियंता व सह सचिव (पीएमजीएसवाय)
महाराष्ट्र शासन

प्रति,

१ प्रधान सचिव (व्यय) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
२ प्रधान सचिव (नियोजन) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
३ सचिव (रस्ते) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
४ मा.प्रधान सचिव, (ग्राम विकास) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
५ महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता)(लेखा परिक्षा) महाराष्ट्र ,मुंबई.
६ महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता)(लेखा परिक्षा) महाराष्ट्र ,नागपूर.
७ विभागीय आयुक्त, (सर्व विभाग)
८ मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती,
९ जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, (सर्व)
१० मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
११ प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, (सर्व)
१२ संचालक, (लेखा व कोषागारे), लेखा व कोषागार संचालनालय, मुंबई.